**वेहळे- पिंपळास खारभूमी योजना, तालुका भिवंडी, जिल्हा ठाणे या योजनेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः खाभूयो २०१७/(प्र.क्र.२७१/२०१७)/खारभूमी**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- ०९ ऑगस्ट, २०१८

<u>पहावे</u> - १. मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग,कोंकण प्रदेश,मुंबई यांचे पत्र क्र. मुअ/जसंविकोप्र/ खारभूमी/ठाणे/वेहळे पिंपळास/तां-२ /३२६१, दिनांक १७/१०/२०१७

२. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे पत्र क्रमांक व्यअस-२०१८/प्र.क्र.४३/अर्थसं-२, दिनांक १६/०५/२०१८.

**<u>प्रस्तावना:-</u>**

वेहळे- पिंपळास खारभूमी योजना, तालुका भिवंडी, जिल्हा ठाणे, या योजनेस शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र.खाभूयो /ईईसी/२००१/(५४९/२००१)/ खारभूमी, मंत्रालय मुंबई-३२, दिनांक २५/०९/२००१ अन्वये एकूण रुपये २८२.०१ लक्षच्या किंमतीस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन १९९९-२००० च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीतील फरकामुळे, स्वामित्व धन शुल्कामुळे, वहन अंतर वाढीमुळे, परिमाणातील वाढ इत्यादी कारणांमुळे वाढ होत असल्यामुळे सदर योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे. या योजनेची एकूण लांबी ५००० मी. आहे. सदर योजना वेहळे - पिंपळास गावाच्या दक्षिणेस उल्हास नदी / मुख्य खाडीच्या उजव्या तीरावर आहे. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून संदर्भाधीन पत्र क्रमांक १ अन्वये प्राप्त झालेला वेहळे - पिंपळास खारभूमी योजनेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

वेहळे - पिंपळास खारभूमी योजना, तालुका भिवंडी, जिल्हा ठाणे, या योजनेस सन २०१६-१७ या वर्षाच्या दरसूचीवर आधारित अंदाजित रूपये ७७६.१३ लक्ष (रुपये सातशे शहात्तर पूर्णांक तेरा शतांश लक्ष फक्त) एवढया रक्कमेस याव्दारे प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामाकरिता रुपये ७१८.८२ लक्ष (रुपये सातशे अठरा पूर्णांक ब्याऐंशी शतांश लक्ष फक्त) व अनुषंगिक कामाकरिता रुपये ५७.३० लक्ष (रुपये सत्तावन्न पूर्णांक तीस शतांश लक्ष फक्त) तरतूद असून तरतूदींचा उपशीर्षवार गोषवारा सोबतच्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे. सदरील सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१. योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशिर्ष “४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद संधारण (०१) खार जमीन योजना (०१) बांधकामे (योजनांतर्गत) (४४०२०३८४)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२. शासन निर्णय, जलसंपदा विभाग दिनांक २२.६.२०१५ मधील अनु. क्र.२ व ३ नुसार खारभूमी योजनेचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी लाभधारकांनी सहकारी संस्था स्थापन करावी व खारभूमी योजना पूर्ण करण्यासाठी पुन:प्रापित क्षेत्रातील लाभधारकांकडून प्रकल्पातील सहभाग म्हणून रुपये ५००/- प्रती हेक्टर खर्च (किमान रुपये २००/- रोख व रुपये ३००/- मजूरीच्या स्वरुपात किंवा रोखीने) घेण्यात यावा. योजनेचे काम पूर्ण झाल्यानंतर योजना देखभाल व दुरुस्तीसाठी त्यांच्याकडे हस्तांतरीत करणे आवश्यक राहील.

३. सदर कामासाठी विहित मार्गाने तरतूद अर्थसंकल्पित केल्याशिवाय त्यावर खर्च केला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

४. या कामाकरीता पर्यावरण विषयक तसेच इतर सर्व वैधानिक मान्यता घेतल्यानंतरच प्रत्यक्ष काम सुरु करावे.

५. सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वयीत करण्याच्या विविध टप्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहित धरता येणार नाही. सदर प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देणेपूर्वी अथवा नंतरही या कामावर कोणतीही अनियमितता झालेली असल्यास अथवा आढळल्यास सदर प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान केल्याने ती नियमीत झालेली आहे असे गृहीत धरता येणार नाही.

६. या योजनेबाबत चालू असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही पूढे चालू ठेवावी. सदर सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे सध्या सुरू असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणा-या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

७. सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती यांचे काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

८. सदर प्रकल्पाच्या प्रस्तावित प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यतेत अंतर्भूत किंमतीला तांत्रिक मान्यता प्राप्त करून घ्यावी.

९. संपूर्ण प्रकल्प हा सदर प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या (कार्यासन -१४३४) अनौपचारिक संदर्भ क्र. १७९/२०१७, दिनांक ०८/०१/२०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १०/व्यय-१२, दिनांक १२.०२.२०१८ नुसार दिलेल्या सहमतीने व व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक २३ एप्रिल, २०१८ रोजी झालेल्या

बैठकीत सदरचा प्रस्ताव मान्य करण्यात आला असून व संदर्भ क्रमांक २ नुसार याबाबतच्या वितरित केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता १८५ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८०९१५२७५६००२७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**सहपत्र**:- परिशिष्ट अ

Milind Anand Wani

Digitally signed by Milind Anand Wani
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=811ef2c18db8728b01579fcb3071e86d7af3216659c06a8d34f3d2dda350efea, serialNumber=74547e206b216404acf50aef877b5d61e16ebdf315f88d58c513e53fab55ecf7, cn=Milind Anand Wani
Date: 2018.08.09 15:30:17 +05'30'

(मि. आ. वाणी)
शासनाचे अवर सचिव

**प्रतिलिपी :-**

१. मा.मंत्री (खारभूमी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
५. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
६. मुख्य अभियंता,(दवप्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई.
८. आंतर वित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. उपसचिव (लघु पाटबंधारे) यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे.
११. अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव,अर्थ शाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अवर सचिव, वित्त विभाग/अर्थ-२,मंत्रालय, मुंबई.
१४. खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

**(शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक खाभूयो २०१७/(प्र. क्र. २७१/२०१७)/ खारभूमी दिनांक ०९ /०८/२०१८ चे सहपत्र)**

## परिशिष्ट-अ

## वेहळे- पिंपळास खारभूमी योजना, तालुका भिवंडी, जिल्हा ठाणे या योजनेच्या प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावातील उपशीर्षनिहाय तरतुदी.

**(रूपये लक्ष)**

| अ.क्र. | उपशिर्ष | मूळ प्र.मा. | प्रथम सु.प्र.मा. |
|---|---|---|---|
| १ | अे-प्राथमिक सर्व्हे | २.०९७ | ०.०० |
| २ | बी-भूमीसंपादन | ०.०० | ०.०० |
| ३ | सी- मुख्य बांधकाम | १०१.५८ | ५८०.४३ |
| ४ | एफ - उघाडी बांधकाम | १०१.४७ | १२३.७८ |
| ५ | के - इमारती | ५.०० | ०.०० |
| ६ | एम - वृक्षारोपण | १.२१ | १.८१ |
| ७ | ओ- संकीर्ण | ९.८५ | १.८० |
| ८ | पी- देखभाल | ०.५१ | १.६४ |
| ९ | आर- दळणवळण | २.९९८ | ९.३६ |
| | **एकूण कामे** | **२२४.७१** | **७१८.८२** |
| | अनुषंगिक खर्च | ५७.३० | ५७.३० |
| | **एकूण** | **२८२.०१** | **७७६.१३** |

## ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुन:प्रापित होणारे क्षेत्र | ४११.८९७ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रुपये) | रुपये १,८८,४२८/- |
| लाभव्यय गुणोत्तर | १.२२ |

Milind Anand Wani

Digitally signed by Milind Anand Wani
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=811ef2c18db8728b01579fcb3071e86d7af3216659c06a8d34f3d2dda350efea, serialNumber=74547e206b216404acf50aef877b5d61e16ebdf315f88d58c513e53fab55ecf7, cn=Milind Anand Wani
Date: 2018.08.09 15:31:12 +05'30'

**( मि. आ. वाणी )**

शासनाचे अवर सचिव